अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना अर्थसहाय्य करण्याच्या योजनेंतर्गत अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना भागभांडवली अंशदान व अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना कर्जे देण्यासाठी सन २०१९-२० या वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी खर्च करण्यासाठी मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन ज्ञापन, क्रमांक: अनौसं-२०१९/प्र.क्र. ११४/अजाक**

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक: ०४ नोव्हेंबर, २०१९.

वाचा: शासन ज्ञापन, सम क्रमांक, दिनांक २४ मे,२०१९.

**ज्ञापन :**

आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना कळविण्यात येत आहे की, अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना अर्थसहाय्य करण्याच्या योजनेंतर्गत अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना भागभांडवली अंशदान व अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना कर्जे देण्यासाठी सन २०१९-२०या वर्षातील अर्थसंकल्पित निधीपैकी शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०८ जुलै, २०१९ अन्वये सन २०१९-२० या वर्षाच्या प्रथम नऊमाहीकरीता (माहे डिसेंबर,२०१९ अखेर) अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर देण्यात आलेला असून सदर निधीपैकी प्रत्येकी रुपये ६,६६,६४,०००/- (अक्षरी रुपये सहा कोटी सहासष्ट लक्ष चौंसष्ट हजार फक्त) निधी खर्च करण्यासाठी उपरोक्त वाचा अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

आता नव्याने उपरोक्त शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर देण्यात आलेला उर्वरीत प्रत्येकी रुपये ५,३३,३६,०००/- (अक्षरी रूपये पाच कोटी तेहतीस लक्ष छतीस हजार फक्त) निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे. याबाबतचे विवरण खालीलप्रमाणे आहे:

(रुपये हजारात)

| अ.क्र. | अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना अर्थसहाय्य करण्याची योजनेंतर्गत अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना भागभांडवली अंशदान | अर्थसंकल्पित निधी रुपये | या ज्ञापनान्वये खर्च करण्यासाठी मान्यता देण्यात येत असलेला निधी रुपये |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | ४२२५,<br>३२,अंशदाने<br>४२२५ ०४५ २ | २,००,०००<br>(अक्षरी रुपये वीस कोटी फक्त) | ५३,३३६<br>(अक्षरी रुपये पाच कोटी तेहतीस लक्ष छतीस हजार फक्त) |

(रुपये हजारात)

| अ.क्र. | अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना अर्थसहाय्य करण्याची योजनेंतर्गत अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना कर्जे | अर्थसंकल्पित निधी रुपये | खर्च करण्यासाठी मान्यता देण्यात येत असलेला निधी रुपये |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | ६२२५,<br>५५, कर्जे व आगाऊ रकमा<br>६२२५ ०२५ १ | २,००,०००<br>(अक्षरी रुपये वीस कोटी फक्त) | ५३,३३६<br>(अक्षरी रुपये पाच कोटी तेहतीस लक्ष छतीस हजार फक्त) |

२. सदर निधी, उक्त उल्लेखित योजनेकरीता या अगोदर वितरीत करण्यात आलेल्या प्रत्येकी रुपये ६,६६,६४,०००/- (अक्षरी रुपये सहा कोटी सहासष्ट लक्ष चौंसष्ट हजार फक्त) अनुदानाचे/निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करण्यात यावे आणि शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०१ एप्रिल व ०८ जुलै,२०१९ मधील नमूद केलेल्या प्रत्येक बाबीची पूर्तता करण्यात यावी, या अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

३. नियंत्रण अधिकारी यांनी उपरोक्त विवरणातील रकाना ४ मधील निधी खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०१ एप्रिल व ०८ जुलै,२०१९ मधील नमूद केलेल्या प्रत्येक बाबीची पूर्तता झालेली आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत योजनांवर होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०१९-२० या वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा:

१. मागणी क्रमांक एन-४

मुख्य लेखाशीर्ष ४२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण यावरील भांडवली खर्च

०१, अनुसूचित जातींचे कल्याण

(०१) (०४) अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना भागभांडवली अंशदान. (अ.जा.उ.यो.) (कार्यक्रम)

३२, अंशदाने

४२२५ ०४५ २

२. मागणी क्रमांक एन-४

मुख्य लेखाशीर्ष ६२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याणासाठी कर्जे

०१, अनुसूचित जातींचे कल्याण

(०१) (०२) अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना कर्जे. (अ.जा.उ.यो.) (कार्यक्रम)

५५, कर्जे व आगाऊ रकमा

६२२५ ०२५ १

१. नियंत्रण अधिकारी यांनी खर्च करताना शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०१ एप्रिल व ०८ जुलै,२०१९ मधील बाबींची पूर्तता करण्याची दक्षता घ्यावी. सदर योजनेचा निधी वितरीत करताना आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासणीच्या अधिन राहून निधी वितरीत करावा.

२. सदर ज्ञापन शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०१ एप्रिल व ०८ जुलै,२०१९ नुसार प्रशासकीय विभागास प्राप्त वित्तीय अधिकारांतर्गत आणि विभागाच्या अर्थसंकल्प कार्यासनाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेले असून त्याचा संकेतांक २०१९११०५१२३५४५०६२२ असा आहे. हे ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil D Sardar

Digitally signed by Sunil D Sardar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0098eb68042c66b72115bc62ef9206ece42981aab126657128d7cadca447533, cn=Sunil D Sardar
Date: 2019.11.05 12:37:07 +05'30'

**(सुनिल सरदार)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
६. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. सर्व प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग.
८. सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०. कोषागार अधिकारी, पुणे.
११. वित्त विभाग (व्यय-१४ / अर्थसंकल्प-३), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती /अजाक